**डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी वास्तव्य केलेले लंडनस्थित घर खरेदी सदर्भातील कार्यवाहीसाठी लंडन येथील विदेश दौऱ्याच्या खर्चाची रक्कम अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - विघयो-२०१५/प्र.क्र.४९/विघयो,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -- ४०० ०३२.
दिनांक :- २२ एप्रिल,२०१५

<u>वाचा:</u>- १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विघयो-०१४/प्र.क्र.८०/विघयो, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१५
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विघयो-२०१५/प्र.क्र.३०/विघयो, दिनांक १८ फेब्रुवारी, २०१५
३) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विघयो-२०१५/प्र.क्र.४९/विघयो, दिनांक १० एप्रिल, २०१५

<u>**प्रस्तावना**</u>

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सन १९२१-२२ मध्ये वास्तव्य केलेले लंडनस्थित १० किंग्ज हेन्री रोड, एन.डब्ल्यु. ३, लंडन येथील घर खरेदी करण्यास मा. मंत्रिमंडळाने दि. ३/२/२०१५ रोजी झालेल्या बैठकीत तत्वत: मान्यता दिलेली आहे.

२. सदर वास्तू घर मालकाने दि. १/९/२०१४ रोजी विक्रीस काढली असून त्यासाठी अन्य खरेदीदारांनी सर्व प्रक्रिया पूर्ण करण्याची तयारी दर्शविल्यामुळे सदर वास्तु खरेदीत राज्य शासनाने स्वारस्य असल्याचे संबंधितांस कळवून त्यासाठी Asking Price च्या १०% रक्कम तातडीने अदा करणे आवश्यक होते. तथापि, शासनस्तरावर विहित प्रक्रीया अवलंबून सदर प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यास काही कालावधी लागणार असल्यामुळे राज्य शासनाने तातडीने कार्यवाही करण्याच्या दृष्टीने मा. मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करण्यासाठी मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीच्या दि. १६/२/२०१५ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार लंडन येथील सदर घर खरेदी करण्यासाठी Asking Price च्या १०% रक्कम या विभागाच्या महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळाच्या भाग भांडवलाच्या रकमेतून अदा करण्याचा शासन निर्णय दि. १८/२/२०१५ रोजी निर्गमित केला आहे. महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळाने सदर रक्कम रु.३.१० कोटी संबंधित सॉलिसिटर मे. सेडॉन (M/s. Seddons Solicitors) यांच्या खात्यात जमा केली आहे.

सदरहू घर खरेदी संदर्भात पुढील कार्यवाहीसाठी मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांच्यासह मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य व प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या लंडन येथील विदेश दौऱ्यास शासनाने (मा. मुख्यमंत्री महोदयांनी) मंजूरी दिली आहे. सदर विदेश दौऱ्यासाठी येणारा साधारणत: रु.१५ लक्ष इतका अपेक्षित खर्च या विभागाच्या अधिपत्याखालील महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळाच्या भाग भांडवलाच्या रकमेतून अदा करण्यास उपरोक्त नमूद दि. १० एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी दिली आहे. सदरहू शासन निर्णय अधिक्रमीत करण्यात येत आहे व पुढीलप्रमाणे सुधारीत शासन निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी वास्तव्य केलेले लंडन येथील घर खरेदी करण्यासंदर्भात पुढील कार्यवाहीसाठी मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांच्यासह मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य व प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या लंडन येथील विदेश दौऱ्यासाठी येणारा साधारणत: ₹२० लक्ष (अक्षरी रुपये वीस लक्ष फक्त) इतका खर्च अपेक्षित आहे. शासन स्तरावर विहित प्रक्रिया अवलंबून या प्रयोजनासाठी निधी उपलब्ध करण्यास काही कालावधी लागणार आहे. यास्तव, सदर विदेश दौऱ्यासाठी येणारा साधारणत: ₹२० लक्ष (अक्षरी रुपये वीस लक्ष फक्त) इतका खर्च या विभागाच्या अधिपत्याखालील महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळाच्या भागभांडवलाच्या रकमेतून करण्यात यावा.

सदर रक्कम ₹२० लक्ष (अक्षरी रुपये वीस लक्ष फक्त) ची प्रतीपूर्ती शासनामार्फत महामंडळास करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२२१७१८५४३७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: CN = Dinesh Ramchandra Dingle, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.22 17:34:09 +05'30'

( दि.रा. डिंगळे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) मा. मंत्री (सा.न्या) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) सह सचिव (महामंडळे/अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ, जुहू सुप्रिम शॉपिंग सेंटर, गुलमोहर क्रॉस रोड नं. ९,जे.व्ही.पी.डी. स्कीम,जुहू, मुंबई-४०००४९.
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११) निवड नस्ती (विघयो)